होत नाहीं, आणि मार्ग न सांपडला तर पाय असतांही त्यांचा काय उपयोग ? ८९० म्हणून, जातीप्रमाणें जो जो योग्य अधिकार असेल, तो आपण आपल्या शास्त्राप्रमाणें समजून घ्यावा. ९१ मग, अर्जुना, दिवा जसा आपल्या घरांतील ठेवा आपल्या डोळ्यांस दाखवितो, तेव्हां तो घेण्याविषयीं प्रतिबंध असतो काय ? ९२ तसें, स्वभावतः आपल्या वांट्यास आलेले व शास्त्रानें खरें केलेलें असें जें विहित कर्म, त्याचें जो आचरण करतो; ९३ पण आळस सोडून व फलेच्छा टाकून मोठ्या हौसेनें शरीरानें जीव लावून त्याठिकाणीं जो आपला सर्व काळ घालवितो; ९४ पाणी ओघांत पडल्यावर जसें भलतीकडे जात नाहीं, तसें ज्याचें आचरण यथाशास्त्र होतें; ९५ अर्जुना, याप्रमाणें जो विहित कर्माचें स्वतः आचरण करतो, तो पुरुष मोक्षाच्या अलीकडले जें द्वार 'वैराग्य' तेथें प्राप्त होतो. ९६ जो अकारण व निषिद्ध या कर्मांचा संबंध होऊं देत नाहीं, म्हणून आत्मप्राप्तीस विरुद्ध जो संसार त्याच्या भयापासून मुक्त होतो; ९७ तसेंच, चंदनाचेंही खोडें पायांत घालण्यास आणिलें तरी पाय अडकवून घेत नाहीं, तसें काम्यकर्माकडे जो कौतुकानेंही पहात नाहीं; ९८ आणि दुसरें जें नित्य कर्म, त्याचा फलत्याग केल्यामुळें तेंही तो संपवितो, म्हणून तो मोक्षाच्या शिवेजवळ प्राप्त होतो. ९९ अशा युक्तीनें कर्माचें निरसन करून शुभाशुभ संसारापासून तो सुटतो, व मोक्षाचें द्वार जें वैराग्य तेथें येऊन उभा राहतो. ९०० जें वैराग्य सकळ भाग्याचा सीमा होय, व मोक्षलाभाचा निश्चय, अथवा कर्ममार्गाचे श्रम परिहार होण्याचें स्थान होय; १ ज्याला मोक्षफळ जामीन झालेलें आहे; किंवा जें सत्कर्मरूप वृक्षाचें फूलच होय, त्या वैराग्याचे ठिकाणी साधक पुरुष भ्रमराप्रमाणें पाऊल ठेवतो. २ पहा – काय आश्चर्य आहे कीं, आत्मज्ञानरूप सूर्याच्या पुढें वैराग्य हें वधव्याप्रमाणें अरुणोदय होय. ३ किंबहुना, आत्मज्ञानरूप जें निधान, तें ज्या वैराग्यरूप दिव्यांजनानें हातास येतें, तें जो जिवेंभावें करून बुद्धिरूप डोळ्यांत घालतो; ४ अर्जुना, अशा प्रकारें विहित कर्माला अनुसरून आचरण केलें असतां, त्याला मोक्षप्राप्तीची योग्यता प्राप्त होते. ५ हे पांडवा, विहित कर्म हा आपल्या कल्याणाचा जिव्हाळा होय, व त्याचेंच आचरण करणें हीच मज सर्वात्मक ईश्वराची सेवा होय. ६ संपूर्ण भोग करून पतिव्रता स्त्री आपल्या प्रियपतीबरोबर क्रीडा करते; त्याच तिच्या आचरणास 'तप' असें म्हणावें. ७ किंवा बाळाला आईवांचून जगण्याला दुसरें साधनच नाहीं, म्हणून तिची सेवा केली असतां त्याचें कल्याण होतें; त्याप्रमाणें, स्वधर्माचें आचरण करणें हाच मुख्य धर्म होय. ८ अथवा, केवळ पाणी समजून गंगेंत राहिलेल्या माशाला तेथें राहिल्यानें जसा सर्व तीर्थांचा सहज लाभ होतो, ९ तसें आपल्या विहित कर्माचें आचरण केल्यावांचून दुसरा उपायच नाहीं, व अशा निश्चयानें त्याचें आचरण केलें असतां, जगन्नाथ जो ईश्वर त्यावर आपलें ओझें पडतें. ९१० अरे, ज्याचें जें विहित कर्म नेमलेलें आहे, तें त्यानें करणें हेंच ईश्वराचें मनोगत आहे, म्हणूनच तें कर्म केलें असतां निःसंशय ईश्वर प्राप्त होतो. ११ दासी असूनही जर राजाच्या कसोटीस उतरली, तर तीच सर्वांची स्वामिणी होते; किंवा स्वामिकार्यार्थ जो आपलें डोकें देणारा, त्याला स्वामी जसा इनामपत्र करून देऊन आपले दप्तरीं दाखला ठेवितो, १२ तसें ईश्वराच्या मनोभावाप्रमाणें वागणें हीच त्याची परम सेवा होय; व यावांचून जें दुसरें कृत्य करणें, तें, अर्जुना, वाणिज्य कर्माप्रमाणें आहे. १३

**ज्याच्या सत्तेनें सर्व भूतांच्या इंद्रियांच्या चेष्टा चालतात, आणि ज्यानें हें सर्व विश्व व्यापलें आहे, त्या ईश्वराला स्वकर्मानें भजणाऱ्या मनुष्याला ज्ञाननिष्ठा योग्यतारूप सिद्धि मिळते.॥ ४६ ॥**

म्हणून, विहित कर्म केलें म्हणजे, तें कर्म केलें असें नव्हे, तर ज्या परमात्म्यापासून सर्व भूतें उत्पन्न झालीं आहेत, त्याचें मनोगतच आपण पाळिलें ! १४ जो परमात्मा अज्ञानरूपी चिंध्या गुंडाळून जीवरूपी बाहुल्या तयार करतो, आणि [ सत्त्व, रज व तम अशा ] तीन पदरी अहंकाररूप सूत्रानें त्यांना खेळवितो, १५ दिवा जसा तेजानें अंतर्बाह्य भरलेला असतो, तसें ज्या परमात्म्यानें हें सर्व जग अंतर्बाह्य ओतप्रोत भरलेलें आहे, १६ वीरा अर्जुना, त्या सर्वात्मक ईश्वराची स्वकर्मरूपी पुष्पांनीं पूजा केली असतां, ती पूजा त्याला परमसंतोषकारक होते. १७ म्हणून त्या पूजेच्या

जिये पूजे । रिझोनि[1] आत्मराजें । वैराग्यसिद्धि देइजे[2] । प्रसादु तया ॥१८॥ जिये वैराग्यदशे । ईश्वरातेंचि[3] वेधलें[4]सें । हें सर्वही नावडे जैसें । वांत होय ॥१९॥ प्राणनाथाचिया आधीं । विरहिणीतें जिणेंही बाधी[5] । तैसें सुखजात त्रिशुद्धी । दुःखचि लागे ॥९२०॥ सम्यक्ज्ञान[7] नुदैजतां । वेधेंचि तन्मयता । उपजे ऐसी योग्यता । बोधाची लाहे ॥२१॥ म्हणौनि मोक्षलाभालागीं । जो व्रतें वाहतसे आंगीं । तेणें स्वधर्मु आस्था[8] चांगी । अनुष्ठावा ॥२२॥

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥४७**

**अन्वय**—विगुणः स्वधर्मः स्वनुष्ठितात् परधर्मात् श्रेयान् [ अस्ति ]. स्वभावनियतं कर्म कुर्वन् नरः किल्बिषं न आप्नोति. ॥४७॥

अगा आपुला हा स्वधर्मु । आचरणीं जरी विषमु[9] । तरी पाहावा तो परिणामु । फळेल जेणें ॥२३॥ जैं सुखालागीं आपणपयां । निंबचि आथी धनंजया । तैं कडुवटपण तयाचिया । उबगिजे[10] ना ॥२४॥ फळणया[11] ऐलीकडे । केळीतें पाहतां आसे[12] मोडे । ऐसी त्यजिली तरी जोडे । तथ कें गोमटें[13] ॥२५॥ तेवीं स्वधर्मु सांकडु । देखोनि केला जरी कडु । तरी मोक्षसुरवाडु[14] । अंतरला कीं ॥२६॥ आणि आपुली माये । कुब्ज[15] जरी आहे । तरी जीजे तें नोहे । स्नेह कुन्हें[16] कीं ॥२७॥ येरी जिया परांचिया[17] । रंभेहूनि बरविया । तिया काय कराविया । बाळकें तेणें ॥२८॥ अगा पाणियाहूनि बहुवें । तुपीं गुण कीर आहे । परी मीना काय होये । असणें तेथ ॥२९॥ पैं आघविया जगा जें विख । तें विखकीडियाचें पीयूख । आणि जगा गुळ तें देख । मरण तया ॥९३०॥ म्हणौनि जें विहित जया जेणें । फिटे संसाराचें धरणें । क्रिया कठोर तऱ्ही तेणें । तेचि करावी ॥३१॥ येरा पराचारीं बरविया । ऐसें होईल टेंकलेया[20] । पायांचें चालणें डोइया । केलें जैसें ॥३२॥ यालागीं कर्म आपुलें । जें जातिस्वभावें असे आलें । तें करी तेणें जिंतिलें । कर्मबंधातें ॥३३॥ आणि स्वधर्मुचि पाळावा । परधर्मु तो गाळावा । हा नेमुही पांडवा । न कीजेचि मा ॥३४॥ तरी आत्मा दृष्ट नोहे । तंव कर्म करणें कां ठाये । आणि करणें तेथ आहे । आयासु आधीं ॥३५॥

**सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् ।**
**सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ४८**

**अन्वय**—कौन्तेय, सहजं कर्म सदोषम् अपि न त्यजेत् ; हि धूमेन अग्निः इव सर्वारंभाः दोषेण आवृताः [ संति ]. ॥४८॥

म्हणौनि भलतिये कर्मीं । आयास जऱ्ही उपक्रमीं[21] । तरी काय स्वधर्मीं । दोषु सांगें ॥३६॥ अगा उजू वाटा चालावें । तऱ्ही पायांचि शिणावें । ना आडरानें धांवावें । तऱ्ही तेंचि ॥३७॥ पैं शिळा कां सिदोरिया । दाटणें एक धनंजया । परी जें वाहतां विसांवयो[22] । मिळिजे तें घेपे ॥३८॥ येऱ्हवीं कण[23] आणि भूसा । कांडितांही सोसु[24] सरिसा । जेंचि रंधन मांसा । तेंचि हेंवी[25] ॥३९॥ दधी जळाचिया घुसळणा । व्यापार सारिखेचि विचक्षणा । वाळुवे तिळा घाणा । गाळणें एक ॥९४०॥ पैं नित्य होम देयावया । कां सैरीं[26] आगी सुवावया[27] । फुंकितां धू धनंजया । साहणें तेंचि ॥४१॥ परी धर्मपत्नी वोंगळी[28] । पोसितां जरी एकी वोढी[29] । तरी कां अपरवडी[30] । आणावी आंगा ॥४२॥ हां

१ संतुष्ट झाल्यावर. २ प्रसाद. ३ छंदानें. ४ वांती ५ चितेनें. ६ तुच्छ वाटतें. ७ अपरोक्ष ज्ञान ८ ध्यासानें. ९ कठीण. १० कंटाळूं नये. ११ पिण्याचे पूर्वी. १२ आशा. १३ उत्तम फल. १४ सुख. १५ कुरूप. १६ वाकडें. १७ इतर स्त्रिया. १८ दुसऱ्याच्या धर्माचें. १९ आचरण केल्यास. २० कसें राहील. २१ सुरवातीस. २२ विसाव्याचे ठिकाणीं २३ धान्य. २४ श्रम. २५ होम. २६ इतर कामाकरितां. २७ पेटविण्यास. २८ ठेवलेली स्त्री. २९ सारखाच खर्च लागतो; खर्चाची ताणाताण होते. ३० अपकीर्ति.